**पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या कार्यक्षेत्रात चिंचवडगाव येथे क्रांतिवीर चापेकर बंधूचे स्मारकाच्या विकासकामासाठी रु.१३.३७ कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत....**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२४/प्र.क्र. ४८/नवि-२०**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २८ मार्च, २०२५

**वाचा :**

१) नगरविकास विभाग शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.२८८/नवि-२०, दि.०४.०१.२०१६.

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७.०३.२०२५.

३) नगर विकास विभाग, शासन निर्णय, क्र.पीसीसी-२०२३/प्र.क्र.३०८/नवि-२२, दि.३१.०१.२०२५.

४) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र जा.क्र.ब.क्षे./स्था./कावि ९५/२०२३, दि.२१.०६.२०२३.

**प्रस्तावना :-**

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या कार्यक्षेत्रात चिंचवडगाव येथे क्रांतिवीर चापेकर बंधूचा जुना वाडा ही पुरातन ऐतिहासीक वास्तू आहे. ही वास्तू मोडकळीस आल्यामुळे पिंपरी चिंचवड महानगरपालिकेकडुन या ठिकाणी क्रांतिवीर चापेकर बंधुचे स्मारक उभारण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेमार्फत क्रांतिवीर चापेकर बंधूचे स्मारक उभारणेकरीता महापालिका सभा ठराव क्र. ३५४९, दि.२३.०९.१९९७ अन्वये रू.२९,२२,८७०/-च्या खर्चास मंजूरी देण्यात आली व त्यानुसार क्रांतिवीर चापेकर बंधुचे स्मारकाचे पहिल्या टप्प्याचे काम पूर्ण झाले आहे. तसेच स्मारकाचे दुसऱ्या टप्प्यातील रु.४४,३८,१९०/- इतक्या रकमेचे काम करण्याच्या प्रस्तावास महापालिका सभा ठराव क्र. ४७५२, दि. २४.१२.२००२ अन्वये मान्यता देण्यात आली असुन सदर मान्यतेनुसार दुसऱ्या टप्प्यामध्ये स्मारकाचे पुरातन वाड्याचे धर्तीवर मंजूर नकाशाप्रमाणे काम पूर्ण करण्यात आले आहे. तिसऱ्या टप्प्यात उर्वरीत कामांबरोबर बहुउद्देशिय सभागृह, प्रदर्शनाकरीता हॉल, ऐतिहासिक वस्तूंच्या संग्रहालयाकरीता हॉल, कॉन्फरन्स हॉल, जिमनॅशियम हॉल इत्यादी कामे करण्यासाठी पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने ठराव पारीत केले आहेत.

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेने प्रस्तुत क्रांतिवीर चापेकर बंधूचे स्मारकाच्या विकसनासाठी रू.६८,०८,५८,३६१/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक तयार केले असुन पिंपर चिंचवड महानगरपालिकेकडून ४०% (रू.२६,९८,८०,९३७/-) इतका खर्च करण्यात येत असून शासनाकडून ६०% म्हणजेच रू.४१,०९,७७,४२४/- इतक्या निधीची आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी दि.२१.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये मागणी केली आहे. त्यानुषंगाने आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांचे दि.२१.०६.२०२३ चे प्रस्तावाचे अनुषंगाने नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.पीसीसी-२०२३/प्र.क्र. ३०८/नवि-२२, दि.३१.०१.२०२५ अन्वये रु.६८,०८,५८,३६१/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या कार्यक्षेत्रात चिंचवडगाव येथे क्रांतिवीर चापेकर बंधू स्मारकाच्या विकासकामासाठी रु.१३,३७,००,०००/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या कार्यक्षेत्रात चिंचवडगाव येथे क्रांतिवीर चापेकर बंधू स्मारकाच्या विकासकामासाठी रु.१३,३७,००,०००/- इतका निधी वितरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

०१.	उपरोक्त नगर विकास विभाग शासन निर्णय, क्र. पीसीसी-२०२३/प्र.क्र.३०८/नवि-२२, दि.३१.०१.२०२५ नुसार विहित अटी व शर्तींच्या अधीन राहुन आवश्यक ती कार्यवाही करावी.

०२.	दिनांक ३१ मार्च, २०२६ अखेर हा निधी खर्च करण्याची मुदत संपल्यानंतर जिल्हाधिकारी, पुणे यांनी या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करीता वितरीत करण्यात येणाऱ्या सर्व निधीच्या उपयोगिताचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे. सदरची उपयोगिता प्रमाणपत्र एकत्रितरीत्या संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करुन खर्चित व अखर्चित निधीचा अहवाल शासनास सादर करावा.

०३.	सदर स्मारकाच्या उर्वरित निधीकरिता स्मारकाच्या कामाच्या प्रगतीच्या अनुषंगाने आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांनी मागणी करावी.

०४.	या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या एकुण रक्कम रु.१३,३७,००,०००/- (रुपये तेरा कोटी सदतीस लाख फक्त) चे कार्यान्वयन यंत्रणेस वितरण करण्यासाठी जिल्हधिकारी, पुणे यांना नियंत्रण अधिकारी तसेच जिल्हा प्रशासन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदरचा निधी आहरीत करुन कार्यान्वयन यंत्रणेस वितरीत करावा.

०५.	यासंबंधीचा खर्च मागणी क्र. एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगर विकास, ८०, सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (८३) नागरी भागात स्मारके उभारण्यासाठी महानगरपालिकांना सहाय्यक अनुदान, ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर), (२२१७ A०३८) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता रु.१३,३७,००,०००/- (रुपये तेरा कोटी सदतीस लाख फक्त) निधी मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा.

०६.	नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र.५५/२०२५/१४४४, दि.०६.०२.२०२५ तसेच वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र.१६८/२०२५/व्यय-३, दि.२०.०३.२०२५ अन्वये प्राप्त सहमती व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.३१.०१.२०२५ अनुसार सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

०७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२८१९३१३७९५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANILKUMAR RAMDASPANT UGLE

Digitally signed by ANILKUMAR RAMDASPANT UGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=1d265dc74c98f72f41f5a1403db16525e09e7de2e336c366de3a32ea2a050a8a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8BBD8635D43D23F28021156F38051619258C51238668F40D15D3209EA39554AA, cn=ANILKUMAR RAMDASPANT UGLE
Date: 2025.03.28 19:32:54 +05'30'

**(अनिलकुमार रा. उगले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव
४) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
७) सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य

८) मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
९) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
१०) जिल्हाधिकारी, पुणे
११) आयुक्त, महानगरपालिका पिंपरी चिंचवड
१२) जिल्हा प्रशासन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
१३) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१५) वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/ अर्थसं-१६ / नियोजन विभाग/का.१४४४, मंत्रालय, मुंबई
१६) उप सचिव (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) कक्ष अधिकारी (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) कक्ष अधिकारी (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सदरचा शासन निर्णय विभागाच्या नागरिकांची सनद वर प्रसिध्द करण्यात यावा.
२०) निवडनस्ती (नवि-२०)